जिल्हा न्यायाधीश -१ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, चिपळूण यांना "कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. डीडीओ ०८२०/२०२/प्र.क्र.६३/कार्यासन ११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०३ सप्टेंबर, २०२०

वाचा : १. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक:संकीर्ण २०१८/७४२/प्र.क्र.१३४/कार्या.११, दि.२३/७/२०१९
२. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक. संकीर्ण २०१८/७४२/प्र.क्र.१३४/कार्या.११, दि. २८/१/२०२०
३. शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्रमांक:संकीर्ण २०१८/७४२/प्र.क्र.१३४/कार्या.११, दि.१८/२/२०२०
४. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. B(W)A-१२०३/२००८/५७४/१००५५/२०२०, दि.१६/६/२०२०
५. जिल्हा न्यायालय, रत्नागिरी यांचे पत्र क्र.प्रशाब ४/१५३६/२०२०, दि.११/३/२०२०

प्रस्तावना :

रत्नागिरी जिल्ह्यातील चिपळूण येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय स्थापन करण्याबाबत व त्याकरीता आवश्यक पदे निर्माण करण्यास संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये सदर न्यायालयासाठी लाक्षणिक पुरवणी मागणीद्वारे विधानमंडळात मंजूर झालेला रु.७,०००/- इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. तसेच संदर्भ क्र.३ येथील अधिसूचनेनुसार सदर न्यायालय ८ मार्च, २०२० पासून कार्यरत करण्यात आले आहे. मा.उच्च न्यायालयाच्या संदर्भ क्र.४ च्या व जिल्हा न्यायालय, रत्नागिरी यांच्या संदर्भ क्र.५ च्या पत्रान्वये जिल्हा न्यायाधीश -१ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, चिपळूण, जि.रत्नागिरी यांना "कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याची विनंती केली आहे. त्यानुसार सदर बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

रत्नागिरी जिल्ह्यातील चिपळूण येथील जिल्हा न्यायाधीश -१ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, चिपळूण यांना **"कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तीय बाबीपुरतेच मर्यादित राहतील.

२. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, दिनांक १७/४/२०१५ मधील भाग -पहिला, उप विभाग एक मधील अनुक्रमांक ३, नियम क्र.२ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम १५ (३) व १५६ अन्वये दिलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९०४१६३५२२१११२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Navagire Santosh Sampatti

Digitally signed by Navagire Santosh Sampatti
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=214b4345a2842afe7dd0cbda9e8d83579cbedaaaef30f215ceda096e4e407797, serialNumber=0cb1b0de020015cf6d1f800579271f4816460b1802c2ae247dd6dd6f47462cd3, cn=Navagire Santosh Sampatti
Date: 2020.09.04 16:40:41 +05'30'

**( सं. सं. नवगिरे )**

कार्यासन अधिकारी

**प्रत:**

१) प्रबंधक (निरीक्षणे- १/२), उच्च न्यायालय, मुंबई.

२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, रत्नागिरी.

३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा)महाराष्ट्र राज्य, मुंबई.

४) जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय, चिपळूण, जि.रत्नागिरी

५) जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी.

६) उप कोषागार अधिकारी,चिपळूण, जि.रत्नागिरी

७) कक्ष अधिकारी कार्यासन २३/२४/२५,विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) निवडनस्ती.